# क्रमांक ४ : विश्वशक

आतां शेवटचा विश्वशक. लेखाङ्कांत हा शेवटीं आला आहे; मात्र हा अगदी पहिल्या क्रमांकाचा शक आहे.

ज्या युगांत, ज्या कालखण्डांत आम्ही आहोत, त्या युगांतील हा महत्वाचा शक आहे. अखिल मानवजातीच्या जीवनाची द्वारका या शकावर उभी आहे. हा **अंतराळ युगांतील विश्वशक आहे.**

मागील तीन लेखांत महाराष्ट्राचा पूर्व इतिहास, ज्याचे आम्ही वारस आहोत, त्याचें अवलोकन केले. हा पूर्व इतिहास नसेल तर आम्ही अधर लोंबकळून संपून जाऊं; म्हणून या पूर्व इतिहासाची फार फार आवश्यकता आहे.

आजमितीस महाराष्ट्र अन्तर्बाह्य समृद्ध होण्यासाठीं आमच्या जीवननिष्ठेचें स्वरूप कसें असायला हवे? अगदी अल्पाक्षरांत सांगायचे झाल्यास 'ज्ञान-विज्ञान' या दोनच शब्दांत तिचें स्वरूप स्पष्ट होईल.

वेदान्त नि विज्ञान तशीच ती दक्षता, असे तीन
तेथे नित स्थिर होता शान्ति-समृद्धि नटेल या जगतीं।।

ज्ञानाचा विचार करतां, बहुजन व्यावहारिक समाजाला ‘श्रीमत् भगवत् गीता’ हा ग्रंथ अतिशय सहजस्वाभाविक आणि सुयोग्य आहे. जीवनाच्या सर्वांगांना व्यापून असलेला असा आहे. तेव्हां गीतेचा सर्वांगीण व सखोल अभ्यास हें आपल्या जीवनाचें एक सूत्र आहें.

जीवनाचें दुसरें सूत्र म्हणजे ‘विज्ञान’  ज्ञानदेवांच्या भाषेंत ‘जेणें हा विश्वाकारूं संभवे’ तें विज्ञान. गेलेलें अर्धशतक विज्ञानाचें होतें; मात्र तें तसें जाणवावे इतकें आमचें लक्षच त्याकडे गेलें नाहीं. अर्थात् हा आमचाच दोष होता. आतां मात्र, या विद्यमान शतकांत हें विज्ञान आपल्या पूर्ण वैभवासह प्रकट झालें आहें. यामुळें आम्हास त्याची पूर्ण जाणीव झाली आहे, त्याचें खरे माहात्म्य ध्यानीं आलें आहें.

आमचें बाह्य-जीवन समृद्ध करण्यांत त्याचें फार मोठे स्थान आहें. जीवनांत तें अतिशय सुप्रतिष्ठित करायला हवे आहें. यासाठीं आम्ही या विज्ञानाची जीवाभावानें उपासना करण्यास सिद्ध झाले पाहिजे.

मी उपासना हा शब्द वापरला आहे. ही उपासना चित्ताची शुद्धि करते. विश्वाचें पालन तर करतेंच करतें. मात्र निरंजना पैलीकडे नेऊन घालणें हें तर तिचें मुख्य कार्य आहें.

कारण हें व्यक्त जीवन सापेक्ष सत्य आहें, निरपेक्ष सत्य नाहीं. त्याला Relative Value आहें, Absolute Value कधीच असूं शकत नाहीं. यामुळेंच मानवी जीवनाला सर्वस्व मानणे ही चुकीची दृष्टि आहे.

मी त्या पूर्ण आणि विशाल जीवनाला निरंजन हा शब्द वापरला आहे. अंजन म्हणजे काजळी, काळेपण. तें विशाल जीवन निष्कलंक आहे.

उपासक 'अनामयं पदं गच्छन्ति' असे गीता म्हणते. 'अनामयं' या पदासाठीं मराठी संत-वाङ्मयांत 'अच्युत' शब्द आला आहे. ज्या पदापासून च्युति नाही, ढळणें नाही असें अच्युतपद. देह, मन, बुद्धीच्या पलीकडील हें क्रान्त-दर्शन आहें. पावावया उपासना। ब्रह्मस्थानीं प्रस्थान।। या सगळ्या विवेचनाचा सरळ अर्थ असा कीं, तत्त्ववेत्ता हाच विज्ञानाच्या उपासनेचा खरा अधिकारी आहे. त्यालाच हें विज्ञान खऱ्याअर्थी कळणार आणि त्याच्याच जीवनांत तें सुप्रतिष्ठित होणार.

आमच्या जीवन-निष्ठेचें स्वरूप असणारें ज्ञान-विज्ञान हें असे परस्परावलंबी आहेत. या दोहोंच्या साधनेंत आमचें अंतर्बाह्य जीवन उजळून निघणार आहे. तें सार्थकी लागल्याचें समाधान

मिळणार आहे. ‘‘याजसाठीं केला होता अट्टाहास। शेवटचा दिस गोड व्हावा’’ असा हा एकूण अर्थ आहे.

मानवी बुद्धीच्या चमत्काराचें दर्शन घडविणारे हें शतक आहे. विद्युतयांत्रिक वस्तू व सुविधांनी आमची नगरें व घरें कांठोकांठ भरली आहेत. आमचा दिवसच मुळीं विज्ञानानें उगवतो आणि विज्ञानानें मावळतो. एक पाऊलहि आम्हांस विज्ञानाशिवाय उचलता येत नाही आणि एक पळहि विज्ञानाशिवाय जात नाही. आमची घरें, वाहनें, कार्यक्षेत्रें, नगरें इंचाइंचानें विज्ञानानें व्यापली आहेत.

अशा या सर्वव्यापी विज्ञानाचा आम्ही अत्यंत अहोभावानें व सर्वभावानें स्वीकार करावयास हवा. विज्ञानाचा आम्ही स्वीकार केला नाही. आम्ही त्याला कवटाळतो. एखाद्या भक्षासारखी आम्ही त्याच्यावर झडप घालतो. त्याच्यावर कब्जा करतो. त्याचे स्वामी होऊन बसतो. आम्ही त्याला गुलाम केले आहे. किंवा आमच्या स्वार्थापोटीं आम्ही त्याला आपला भिडू अथवा पित्त्या बनवून आणि गळयांत गळे घालून ‘एकमेका साह्य करूं। अवघे धरूं। कुपंथ’ अशी आमची वाटचाल सुरूं झाली आहे.

विज्ञानानें बुद्धीची प्रभा फाकावयास हवी. चित्ताची शुद्धता व्हावयास हवी. तेच विज्ञान आम्ही अशा चुकीच्या दृष्टीनें वापरतो कीं, त्यामुळें वासनेला खतपाणी मिळावें. अंतः-

करणांत विकारांचें तांडव उभे रहावें. अभिलाषा आणि लोभीपणाचें थैमान सुरूं व्हावें.

विज्ञानाच्या या अनर्थकारी परिणामास मनुष्यच कारणीभूत आहे. मात्र, असे विज्ञानाचे विपरीत परिणाम दिसून आल्यावर आम्ही म्हणतो, विज्ञानच वाईट आहे. हा चोराचा उलटा शंखध्वनी आहे.

भारतीय तत्त्ववेत्ते म्हणतात, मृत्यु-लोक ही कर्मभूमि आहे, भोगभूमि नव्हें. विज्ञान हा गीतोक्त कर्मयोग आहे. आणि गीतोक्त कर्मयोग ही शुद्ध वैज्ञानिक दृष्टि आहे. ‘सुखासाठीं राज्य’ ही अर्जुनाची कर्मयोगाविषयीं चुकीची दृष्टि होती. त्याचप्रमाणें सुखासाठीं, करमणुकीसाठीं, उपभोगासाठीं विज्ञान ही अवैज्ञानिक दृष्टि आहे.

खरे म्हणाल तर आम्हाला विज्ञान कळलेच नाही. बहुमूल्य हिरा आहे सामान्य माणसाला तो ओळखूं तरी येईल का? विज्ञानाबाबत आमची स्थिती अगदी अशीच आहे.

आनंदानें करूं विज्ञाना तुझाच जयजयकार।
तुझीच सेवा अभ्युदयाचा घडवी साक्षात्कार।।

हें काव्य ज्यानें लिहिलें त्याला विज्ञानाचें कितपत आकलन झालें होतें याविषयीं शंकाच आहे. पूर्वकाळींच्या पुण्यपुरूषांच्या केवळ विचारांत स्खलन असेल तर पुढील पिढ्यांच्या आचारांत हिमालयाएवढ्या चुका होऊं शकतात जे इहलोकाचाच विचार करतात, ते विचारकच नव्हेंत. भले त्यांचें आचरण धुतल्या तांदुळासारखे का असेना! त्यांना यासाठीं 'शुद्ध विकारी' हीच संज्ञा द्यावी लागेल अशांचें वक्तव्य म्हणजे विज्ञानाच्या जगभर होत असलेल्या विपरीत परिणामावरील उपाययोजनांच्या त्या मलमपट्टया आहेत.

अभ्युदय हा विज्ञानाचा पार्श्वपरिणाम आहे. त्याला अत्यधिक महत्व देणें हा बुद्धीचा व्यामोह आहे. सूर्य अगदी नियमानें रोजच्यारोज उगवतो. त्रिभुवनाला प्रकाश देतो. कधी त्याचें आभार मानलेत? सूर्य हें विज्ञान नाही का? विज्ञानाविषयीं तुम्हाला एवढा पुळका कां? वेदांतील सूर्य उपासनेचा गायत्री मंत्र पहा—

श्रेष्ठ तें तेज सूर्याचें आम्ही ध्यातो मनें सदा।
प्रेरणा बुद्धितें देवो, मागणे स्मरूनी पदा।।

त्यांची विज्ञानाकडे पाहण्याची दृष्टि कशी आहे! आम्हाला जीवनच कळलें नाही तर विज्ञान कसें कळणार? विज्ञानाचा गरिमा, महिमा फार वेगळा आहे. त्याच्या उपयोगावरून आम्ही त्याचें मूल्यमापन करतो. फार चुकीची दृष्टि आहे ही!

याचा अर्थ विज्ञानाचा उपयोगच करूं नयें असे समजण्याचें कांहीं कारण नाहीं. तुम्ही काय करतां यापेक्षा तुम्ही कुठल्या दृष्टीनें करतां याला फार महत्व आहे. सृष्टी तीच असते मात्र दृष्टि बदलली की सृष्टी बदलते हें ध्यानीं घ्यावे. जीवनांतील सुविधासाठीं विज्ञानाचा उपयोग करूं नका असे कोण वेडा म्हणेल!

मुख्य मुद्दा एवढाच कीं, कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ. विज्ञानापेक्षा वैज्ञानिक दृष्टिकोन, वैज्ञानिक बुद्धि श्रेष्ठ. गीता म्हणते—

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगात् धनंजय।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणः फलहेतवः॥

विज्ञान कमालीचे समृद्ध व प्रगत झालें आहें. ‘गगनाला गवसणी घालणे’ हा शब्द-प्रयोगहि त्याच्याबाबतींत थिटा पडूं लागला आहे. गगनाचीहि कक्षा ओलांडून तें आतां अंतराळांत {Space} प्रवेश करूं लागले आहे. हें विज्ञान, आजघडीला त्याला ज्ञानाचें अधिष्ठान न राहिल्यामुळें तें अनर्थकारी होऊं लागलें आहे.

वास्तविक ‘ज्ञान-विज्ञान’ हेंच मूलतः जीवनाचें स्वरूप आहे. आम्ही ज्ञानविरहित विज्ञान हा नसलेला भेद निर्माण केला. आतां हें विज्ञान विपरीत परिणाम घेऊन जगभर अवतरलें आहें. रूपया हा रूपयाच आहे. तो छाप अथवा काट्यावर अवलंबून

नाही. अथवा छाप-काट्यामुळें रूपयांत कांहीं फरकहि पडत नाही, तरी छाप-काट्याशिवाय रूपयाची कल्पना करतां येत नाही आणि ही जीवनाची मौज आहे.

ज्ञान-विज्ञानानें लक्षित होणारी जीवननिष्ठा आमच्या कल्पनेंत मावणारी नाही. विश्लेषण हेंच मुळी बुद्धीचें स्वरूप आहे. विश्लेषण केल्याशिवाय बुद्धीला कोणत्याहि सृष्टपदार्थाचें मूल्यमापन करतां येत नाही. पण तें अपुरें असणार हा दोष नियतीनेंच तिच्या माथीं कायमचा मारला आहे.

Analysis हा बुद्धीचा धर्म आहे. मात्र Synthesis, संश्लेषण हा बुद्धीचा प्रान्तच नव्हें, उलट बुद्धि ओलांडून गेल्यावर, Transcend झाल्यावर जें प्राप्त होते त्याला संश्लेषण म्हणतात; तर मग तें बुद्धीच्या आटोक्यांत कसें येईल? अर्थात् येणे कधीहि शक्य नाही. या संश्लेषणाला ज्ञानदेवांनी ‘समावेशन’ असा शब्द वापरला आहे.

शिवशक्ति समावेशें। नमन केलें म्या ऐसे।
रंभागर्भ आकाशें। रिगाला जैसा।। अमृतानुभव

या अंतर्योग्यतेचा अभाव असल्यामुळें विज्ञान आज भोगाचें साधन झालें आहें. या भोगवादाला पूर्वकाळीं हजारों वर्षांत मिळालें नाही एवढे खतपाणी मिळालें आहें. याचा परिणाम म्हणजे एवढ्या वैभवी आणि समृद्ध अशा या कालखण्डांत मानवी जीवनाचा ऱ्हास होत चालला आहे.

पूर्वी ब्रह्मविद्या गुप्त ठेवली जात होती. अधिकार पाहूनच ती दिली जात होती. ती प्रकट झाल्यावर लोक 'चावटी' करतील असा शब्द-प्रयोग त्यावेळीं केला जात होता. नाथांच्या घरीं एक ब्राह्मण आले. नाथांनी विनंति करूनहि स्नान न करताच ते भोजनास बसले. त्यांचे म्हणणें असे कीं, आम्ही रोज ज्ञान-गंगेंत स्नान करतो त्यामुळें बाह्य-स्नानाची आम्हांस आवश्यकता नाहीं. याला 'चावटी' म्हणतात. मनुष्य असा वाह्यात होतो. यानंतर नाथांनी त्यांना चांगला धडा शिकविला हा भाग वेगळा.

याचा अर्थ असा कीं, 'सगुण नेले ब्रह्मज्ञानें। निर्गुण नेले संदेहानें।।' ब्रह्मविद्या उघड केल्यामुळें म्हणजे ब्रह्मज्ञानाच्या शाब्दिक जाणिवेमुळें सगुणांत रस वाटणार नाही आणि निर्गुण खरोखर असतें का? कां तें एक मृगजळ आहे? अशा शंकेनें अंत:करण पोखरले गेल्यामुळें लोक कर्मशून्य होऊन जीवनाचें ओसाड वाळवंट होईल. असें होऊं नयें म्हणून ब्रह्मविद्या कित्येक वर्षे गुप्त ठेवली होती. नंतर ती जन-सामान्यापर्यन्त उघड केल्यामुळें मला नाहीं वाटत कीं, त्याचा परिणाम या भरतखण्डांत फार चांगला झाला आहे. स्थिती तर उलटीच वाटतें.

ब्रह्मविद्येप्रमाणें विज्ञानाची सर्व सुखसाधनें अगदी सामान्य माणसाच्या आटोक्यांत आल्यामुळें लोक स्फूर्तिहीन, चैतन्यहीन

आणि कर्तृत्त्वशून्य झालें. जीवन रसहीन होत चाललें आहें. टी.व्ही. घ्या, फ्रीज घ्या, अथवा कॉम्प्युटर घ्या, त्यांच्या आगमनानंतर त्यांचें स्वागत 'नव्याचे नऊ दिवस' होतें, पुन्हा दहाव्या दिवशीं तोंड वाकडेच. 'अतिपरिचयात् अवज्ञा' होते.

साधा ट्रेनचा डबा पहा! नीट बारकाईनें पहा. तुम्हांस जाणवेल कीं, सम्राट अकबराचा रथहि एवढा महागडा आणि वैभवी नसेल. मात्र याच डब्यांत अवघ्या १० रूपयाचें तिकीट काढून एक अतिसामान्य माणूस बसतो.

दुसऱ्या स्टेशनवर चढलेला आणि त्याच्याजवळ उभा असलेला बॅरिस्टर असला तरी तो त्याला जागा देत नाही. तो उभा, हा रूबाबांत बसतो आणि वर म्हणतो, 'अहो मिस्टर, तिकीट आहे माझ्याजवळ, फुकट नाही बसलो. गपगुमान उभे रहा.'

असलें प्रगत विज्ञान जीवनांत आल्यावर कुठलें आनंदाचे मळे फुलणार आहेत या माणसाच्या जीवनांत ! ट्रेनमध्यें बसलेल्या या अतिसामान्य माणसाचें स्पीडहि सम्राट अकबराच्या रथापेक्षां कितीतरीपट अधिक आहें. आजच्या या विज्ञान युगांत हा सम्राट अकबराचा बाप या ट्रेनमध्यें बसला आहे. याचा अर्थ याच्यापुढे अकबरहि आज तुच्छ झाला आहे. हा विज्ञानाचा प्रभाव या माणसाचे भले करील असे तुम्हास वाटते?

स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर कालखण्डांत दळणवळणाची म्हणजेच प्रवासाची साधनें, उजेडाची साधनें, स्वयंपाकाची साधनें, करमणुकीची साधनें, गांवें, घरें, पाण्याची परिस्थिती; संपूर्णच जीवनात अक्षरश: जमीन-अस्मानाचें अंतर पडलें आहें. हें मी माझ्या जीवनांत स्वत: अनुभवलें आहें. १९४५ ते १९५० ही वर्षें आठवली म्हणजे वाटतें आपण अतिप्राचीन कालखण्डांत तर नव्हतो ना! खरोखर असे वाटावे एवढा या दोन कालखण्डांत फरक पडला आहे. पूर्वीच्या काळापेक्षां आतां सामान्य माणसाचें जीवन केवढे सुविधापूर्ण आणि समृद्ध झालें आहें! असे असतां उलट मानवजात भंगार होत चालली आहे. अंत:करणें उमदी वाटत नाहींत, भिकार वाटतात, असें कां?

माणूस माणसापासून पळूं लागला आहे, माणूसघाण्या झाला आहे. बंगला आणि फ्लॅट संस्कृति तर स्वतंत्रतेचें भेसूर गायन करूं लागली आहेत. सेल्फकन्टेन्ट फ्लॅट व बंगले दिवस-रात्र दारें बंद करून एकमेकांची मुखावलोकनेंहि निषिद्ध मानूं लागली आहेत. किती उच्च संस्कृति! चोवीस तासांचे सर्व व्यवहार निर्वेधपणें आंतमध्यें पार पडतात. बाहेर येण्याची जरूरीच काय? आधुनिक गुहेंतील हे सर्व योगीजन आहेत. एखादे वेळीं हें गुहेचें द्वार उघडतें, त्यांतून एखादा योगी हातांत ब्रिफकेस घेऊन बाहेर पडतो, तो इकडे तिकडे मुळीसुद्धा न पाहतां सरळ चालू लागतो आणि गुहेचें द्वार फट्कन बंद होतें, तें कित्येक तासासाठीं.

माणूस, माणुसकी, सामाजिक बांधिलकी, समाजसेवा, भ्रातृभाव अशा तत्त्वांचा मंत्रघोष रेडिओ, टि.व्ही या यांत्रिक ऋषिमुनीद्वारें सकाळ-संध्याकाळ अखंड चालूं असतो. यामुळें आमच्या जीवनांत बरेच पुण्य जमा होतें, नाहीं का?

ज्ञान-विज्ञान हेंच जीवनाचें स्वरूप असतां आम्हीं नसलेला भेद निर्माण केला. आतां हें अमाप वाढलेलें विज्ञान आमचें जीवन उध्वस्त करेल यांत शंका नाही. आणि आम्ही कां जगतो, तर मरत नाही म्हणून जगतो असे त्याला अर्थशून्य स्वरूप प्राप्त होईल अशी भीति वाटते.

गीता म्हणते—
ज्ञान विज्ञान तृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः।
तोषला ज्ञानविज्ञानें स्थिर जिंकूनि इंद्रियें। गीताई

विज्ञान आत्मसात करण्याचें, त्याला आपलेच रूप देण्याचें एक स्वतंत्र शास्त्र आहें. त्यासंबंधी अध्ययन आणि दीर्घकाल-पर्यन्त प्रयोग करीत राहिल्यास‘‘तत् स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति।।’’ तें आपल्यांतच सुप्रतिष्ठित असल्याचें प्रत्ययास येईल. तेथ प्रकृति आपणपया। वेगळी नुरें धनंजया। रूपेविण कां छाया। जयापरी।। असे हें विज्ञान मानवजातीच्या जीवनांत आनंदाचे मळे फुलवील.

या विज्ञानाला खरी प्रतिष्ठा प्राप्त झाली अंतराळ युगांमध्यें. तारीख ४ऑक्टोबर १९५७ यावर्षी रशियाच्या स्फुटनिक १ या उपग्रहानें अंतराळांत झेंप घेऊन बीप्बीप् असा आवाज करीत पृथ्वीपासून ८०० मैलावरून पृथ्वीभोवतीं एक प्रदक्षिणा पूर्ण केली; आणि त्याचवेळीं अंतराळ युगाला प्रारंभ झाल्याचें त्यानें सूचित केलें. शास्त्रज्ञांचें म्हणणें असे कीं, ह्या अंतराळ संशोधनांत आमच्या बुद्धीला जें आव्हान मिळालें आहे तसे क्षेत्र पृथ्वीवर आतां उरलें नाहीं. त्यांचें म्हणणें अगदी यथार्थ आहे. कारण या अंतराळ युगांत विज्ञानाला त्याची खरी प्रतिष्ठा प्राप्त झाली. त्याचा गौरव वाढला. तें अमाप समृद्ध झालें. त्याची खरोखर नेत्रदीपक प्रगती झाली.

१२ एप्रिल १९६१ या दिवशीं रशियाचा युरी गागारिन हा पहिला अंतराळ प्रवासी ठरला. पृथ्वीपासून ८०० मैल उंच अंतराळांतून पृथ्वीला एक प्रदक्षिणा घालून ॲटलांटिक महासागरावर तो सुखरूप उतरला आणि पुराणांतील कार्तिकेयाची पदवी संपादन केली.

यानंतर १६ जुलै १९६९ या दिवशीं सायंकाळीं ७ वाजून २ मिनिटांनी अपोलो ११ या अमेरिकन चांद्रयानाचें पृथ्वीवरून उड्डाण झालें.

नंतर पृथ्वीभोवतीं दोन तास प्रदक्षिणा केल्यावर अग्निबाणाचें तिसरें कांड प्रज्वलीत करून चंद्राच्या रोखाने ४

लाख किलोमीटरच्या अविस्मरणीय, ऐतिहासिक, रोमहर्षक चित्तथरारक, आणि स्वप्नमय प्रवासास सुरवात झाली.

तारीख २० जुलै १९६९ रविवारी रात्रीं १वाजून ४८ मिनिटांनी चांद्रयान चंद्रभूमीवर उतरलें. Eagle has landed on the Moon हा संदेश ''व्हॉईस ऑफ अमेरिका'' या रेडियो केंद्रावरून रविवारी रात्रीं १.४८ वाजता सर्व जगभर पाठविला गेला.

तारीख २१ जुलै १९६९ सोमवार, सकाळीं ८ वाजून २५ मिनिटांनी ''नील आर्मस्ट्राँग'' यांनी चंद्रभूमीवर पहिलें पाऊल ठेवलें.

४ ऑक्टोबर १९५७ या दिवशीं पाठविलेल्या स्फुटनिक १नें अंतराळ युगाला प्रारंभ झाला. आणि २१ जुलै १९६९ या दिवशीं विश्वांतील दुसऱ्या ग्रहगोलावर मानवाचें पहिलें पदार्पण झालें.

यासाठीं आमच्या 'महाराष्ट्र पंचांग दिनदर्शिकेंत' आम्ही या वर्षापासून अंतराळ युगांतील विश्वशक प्रारंभ झाल्याचे मानले आहे. या वर्षी ''विश्वशक''—३५ आहे.

चंद्रप्रवास संपून मानव आतां विश्वप्रवासाला निघाला आहे.

शुभास्ते सन्तु पंथानः।

इति लेखनसीमा

आप्पा ठोंबरे.

पौष शुद्ध प्रतिपदा शके १९२५